राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राज्यातील २१० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०१८/प्र.क्र.२६३/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २६ एप्रिल, २०२३

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा. नि. क्र.: पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१ दि.०६ ऑगस्ट २००७.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा. नि. क्र अंनिका-२०१८/प्र.क.२६३/आ-५, दि. २३ नोव्हेंबर, २०२२
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क.८/१६/आ.पु.क. दि. ०८ फेब्रुवारी २०२३
४) संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/आस्था/कक्ष ८अ /२१० अस्थाई पदे/५९५/२३, दि.१५ मार्च २०२३

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अनु.क्र.१ येथे नमुद शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य सेवा संचालनालय (मुख्यालय, मुंबई, कार्यक्रम प्रमुख निहाय तसेच क्षेत्रीय कार्यालये) निहाय पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत २१० अस्थायी पदे वरील अनु.क्र.२ येथे नमुद २३ नोव्हेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली होती. सदर २१० अस्थायी पदांचे कामकाजाचे स्वरुप, गरज व महत्व लक्षात घेता, या पदांना दि.०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत खाली नमूद केलेली २१० अस्थायी कार्यरत पदे राज्यातील जनतेला आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देत असल्याने या पदांना दि.०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर कालावधीत सुधारीत आकृतीबंध मंजूर करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहुन मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | नेत्र शल्य चिकित्सक वर्ग-१ | ६ |
| २ | नेत्र शल्य चिकित्सक वर्ग-२ | १५ |
| ३ | नेत्र चिकित्सा अधिकारी वर्ग-३ | १३८ |
| ४ | ओ.टी. नर्स वर्ग-३ | २४ |
| ५ | वाहन चालक वर्ग-३ | ७ |
| ६ | नर्सिंग ऑर्डली वर्ग-४ | ८ |

| | | |
|---|---|---|
| ७ | शस्त्रक्रिया गृह सहाय्यक वर्ग-३ | ४ |
| ८ | कक्ष सेवक वर्ग-४ | ८ |
| **एकूण** | | **२१०** |

२.   या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ दिलेल्या अस्थायी पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१-नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा
११०-रुग्णालये व दवाखाने
११० (२) मुफसल रुग्णालय व दवाखाने
(०१)(०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने
(अंधत्व नियंत्रण) (२२१० ०१४६)

३.   सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क.८/१६/आ.पु.क. दि. ०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२६१५१४०७१८१७ असा आहे.  हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL HARIDAS DHENGALE

Digitally signed by SUNIL HARIDAS DHENGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=eaf0a3a2ecc0f8d6b1a823821ae00936c4a3290c1bbd85ad7d6a9b64dc0f5392, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=476598C1AEEC16697909C94B2AEDA820B6E3B0FF63279B5B31612103BBEAA15A, cn=SUNIL HARIDAS DHENGALE
Date: 2023.04.26 16:13:59 +05'30'

**( सुनिल ढेंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई/पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (नेत्र), मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व मंडळे).
६. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व).
७. जिल्हा आरोग्य अधिकारी  (सर्व).
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग, व्यय-१३, वि.सु.-१, सेवा-३, अर्थसकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
१३. सार्वजनिक आरोग्य विभाग, अर्थसंकल्प शाखा, सेवा-१, सेवा-५, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (आरोग्य-५).